बागायती रोपमळयांचे बळकटीकरण करणे
ही राज्य पुरस्कृत योजना सन २००९-१० मध्ये
राबविण्यास मान्यता देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन ,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र. रोवाब-४००९/ प्र.क्र. ६१/१३ अे**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-३२,**
**दिनांक : ११ जानेवारी, २०१०.**

**वाचा :-**

१) संचालक फलोत्पादन, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र.आयु./फलो.-१/ शारोवा/बारोबा /२३७१/२००९, दिनांक ९/९/२००९ चे पत्र.

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक: पूरक १०.९/प्र.क्र.१५२/अर्थसंकल्प-३, दि. ३०/६/२००९

३) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्रमांक -पूरक १००९/प्र.क्र. ७६ /२-अे, दि. ६ जुलै,२००९

४) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्रमांक- रोवाब ४००९/प्र.क्र.६१/१३-अे, दि.१५ जुलै,२००९

**प्रस्तावना :-**

राज्यात राबविण्यात येत असलेल्या रोजगार हमी योजनेशी निगडीत फळबाग लागवड कार्यक्रमांतर्गत मुख्यत्वे शासकीय फळरोवाटिकेवरील कलमे / झाडे लाभार्थ्यांना पुरविण्यात येतात तसेच शासकीय रोपवाटिकेवरील कलमे/रोपे यांना बीजोत्पादन कार्यक्रमांतर्गतसुध्दा राज्यात मोठया प्रमाणावर मागणी आहे. या व्यतिरिक्त शेतक-यांना उत्कृष्ट वाणांच्या लागवड साहित्यांचा पुरवठा करणे, उच्चतंत्रज्ञानाची प्रात्यक्षिक प्रक्षेत्रे विकसित करणे, रोपवाटिकेवरील कर्मचा-यांना प्रशिक्षण देणे, इत्यादी अनेक बाबींकरिता शासकीय रोपवाटिकांचे बळकटीकरण करणे आवश्यक आहे. .

शासकीय रोपवाटिकेवरील कलमे/रोपे उत्पादन व इतर माध्यमातून उत्पन्न मिळते. रोपवाटिकाची आर्थिक स्थिती सुधारण्याकरिता उपाययोजना अवलंबण्यात येत असून उत्पादनात वाढ होत आहे. राष्ट्रीय फलोत्पादन अभियान कार्यक्रमासाठी फळपिकाची कलमे/रोपे, भाजीपाला व फुलपिकांची रोपे यासाठी मोठा वाव असल्याने रोपवाटिकासाठी नियमित अनुदान उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. यामुळे सदर योजना राबविण्यास प्रशासकीय मान्यता देणे आणि सन २००९-१० मध्ये शासकीय रोपवाटिकेचे बळकटीकरण करणे या राज्यस्तरीय योजनेसाठी रु. ३५०.०० लाख इतका निधी मंजूर करण्यात आला आहे. त्यापैकी रु.११६.७६ लक्ष इतका निधी संदर्भाधीन क्रमांक-४ च्या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन दिला असून उर्वरित रु.११६.६६ लक्ष उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**२.** सदर योजनेकरिता रु. ११६.६६ लक्ष (रु.एकशे सोळा लक्ष सहासष्ट हजार फक्त) एवढा निधी खालील लेखाशीर्षातील सन २००९-२०१० करिता मंजूर केलेल्या तरतूदींतून भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

मागणी क्रमांक डी -३
२४०१ - पीक संवर्धन,
११९ - बागायती व भाजीपाला पिके,
११९ - (०३) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना
११९ - (०३ ) (०३ ) बागायती रोपमळयांची स्थापना व बळकटीकरण (२४०१ १७४२)

**३.** या योजनेसाठी मंजूर केलेला निधी खर्च करण्यास व त्याचे जिल्हानिहाय वितरण करण्यास **आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी** म्हणून घोषित करण्यात येत आहे. आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी या योजनेच्या अंमलबजावणीसंबधी मार्गदर्शक सूचना संबंधितांना निर्गमित कराव्यात. वित्त विभागाच्या उपरोक्त दिनांक ३०/६/२००९ च्या परिपत्रकातील आणि कृषि व पदुम विभागाच्या उपरोक्त दिनांक ६ जुलै,२००९ च्या शासन निर्णयात उल्लेखिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

**४.** सदर शासन निर्णय, नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनुक्रमे ५२८/१४३१, दि. १९-१२-२००९ व ४९०/अर्थ-१३, दि. ५-१-२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

**५ .** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक (२०१००१०८१५०८४८००१ ) असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**(हे. द. भांगले )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन,**

प्रति,

आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य,पुणे. (५ प्रती)
संचालक फलोत्पादन, कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे, (५ प्रती)
सर्व संचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे,
सर्व विभागीय कृषी सहसंचालक,
सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,
महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे.
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई ( २ प्रती)
सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई -३२,
माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
नियोजन विभाग,(कार्यासन -१४३२ ) मंत्रालय,मुंबई. / वित्त विभाग (व्यय-१ /अर्थसंकल्प -३/१२ )
सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, कृषि व पदुम (कृषि व फलोत्पादन) विभाग, मंत्रालय,मुंबई. / निवडनस्ती